राष्ट्रीय कृषि विकास योजना - कॅफेटेरिया (DPR Based Stream) योजनेकरिता अनुसूचित जमाती प्रवर्गाचा ₹४.२३६६६६७ कोटी निधी वितरित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांक : कृवपदुम-२५०१६/४/२०२५-MAG-१४A

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२५

वाचा -

१. कृषि व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १३-२२/२०२३-PC, दि.१४ डिसेंबर, २०२३.
२. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४
३. राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया राज्यस्तरीय मंजुरी समितीच्या (SLSC) दि.०३ मे, २०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
४. कृषि व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.७-१/२०२४- RKVY, दि.१४ मे, २०२४.
५. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-०५२४/प्र.क्र.१२९/१४-अे, दि.२८.०५.२०२४.
६. कृषि व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.१-१५/२०२४- RKVY, दि.०३ जून, २०२४.
७. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-०५२४/प्र.क्र.१२९/१४-अे, दि.१९.०६.२०२४.
८. केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.७-१/२०२३-RKVY/१, दि. ०१ ऑगस्ट, २०२३.
९. कृषि व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.१-१५/२०२४- RKVY, दि.१७ जानेवारी, २०२५.
१०. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-०५२४/प्र.क्र.१२९/१४-अे, दि.२२.०१.२०२५.
११. कृषि व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.१-१५/२०२४- RKVY, दि.१९ मार्च, २०२५.
१२. कृषि व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.१-१५/२०२४- RKVY, दि.२१ मार्च, २०२५.
१३. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. कृवपदुम-२५०१६/४/२०२५-MAG-१४A, दि.२१.०३.२०२५.

**प्रस्तावना –**

राष्ट्रीय कृषि विकास योजना कॅफेटेरिया ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या अनुक्रमे ६०:४० प्रमाणात अर्थसहाय्याने राबविण्यात येते. राष्ट्रीय कृषि विकास योजना - कॅफेटेरिया योजनेंतर्गत मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील राज्य स्तरीय मंजुरी समितीने योजनेंतर्गत निर्माण झालेले मागील वर्षांचे दायित्व व सन २०२४-२०२५ मध्ये योजनेकडे प्रस्तावित होणारे नवीन प्रकल्प यासाठी आवश्यक निधीच्या प्रमाणात राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया (DPR) या घटकाकरिता ₹२९३.२९ कोटी निधीच्या वार्षिक कृती आराखडयास दिनांक ०३ मे, २०२४ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने संदर्भ क्र.५ येथील दिनांक २८ मे, २०२४ च्या शासन निर्णयान्वये सन २०२४-२५ करीता राष्ट्रीय कृषि विकास योजना - कॅफेटेरिया (DPR Based Stream) योजनेकरिता या योजनेस ₹२९३.२९ कोटी इतक्या रक्कमेस प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात आली आहे.

०२. केंद्र शासनाने संदर्भ क्र.११ अन्वये, राष्ट्रीय कृषि विकास योजना - कॅफेटेरीया अंतर्गत (DPR Based Stream) योजनेच्या केंद्र शासनाचा ₹७४.७४ कोटी (सर्वसाधारण प्रवर्गास ₹५८.९३ कोटी, अनुसूचित जाती प्रवर्गाचा ₹८.८३ कोटी व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा ₹६.९८ कोटी) इतक्या रक्कमेस Mother Sanction म्हणून मान्यता दिली आहे. बीम्स प्रणालीवर अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता ₹७.३९६६६६६ कोटी (केंद्र हिस्सा ₹४.४४ कोटी + राज्य हिस्सा ₹२.९५६६६६६ कोटी) इतका निधी उपलब्ध आहे. त्यामुळे, बीम्स प्रणालीवर शिल्लक निधीनुसार केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेला निधी ₹७२.२० कोटी (सर्वसाधारण प्रवर्गास ₹५८.९३ कोटी, अनुसूचित जाती प्रवर्गाचा ₹८.८३ कोटी व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा ₹४.४४ कोटी) आणि त्याच्या समरुप राज्य शासनाचा एकूण निधी ₹४८.१३ कोटी (सर्वसाधारण प्रवर्गास ₹३९.२८६६६६७ कोटी, अनुसूचित जाती प्रवर्गाचा ₹५.८८६६६६७ कोटी व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा ₹२.९५६६६६६ कोटी) असा केंद्र शासन व राज्य शासनाचा एकत्रित ₹१२०.३३ कोटी (सर्वसाधारण प्रवर्गास ₹९८.२१६६६६७ कोटी, अनुसूचित जाती प्रवर्गाचा ₹१४.७१६६६६७ कोटी व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा ₹७.३९६६६६६ कोटी) निधी संदर्भ क्र. १३ अन्वये वितरित करण्यात आला होता.

आता, आदिवासी विकास विभागाने पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन दिलेला केंद्र हिस्सा (६०%) चा रु.२.५४ कोटी निधी आणि राज्य हिस्सा (४०%) चा रु.१.६९६६६६७ कोटी असा एकूण ₹४.२३६६६६७ कोटी इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय –**

या शासन निर्णयान्वये सन २०२४-२५ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजना (DPR Based Stream) या घटकाच्या अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिस्सा (६०%) ₹२.५४ कोटी निधी आणि राज्य हिस्सा (४०%) ₹१.६९६६६६७ कोटी असा एकूण ₹४.२३६६६६७ कोटी (रुपये चार कोटी तेवीस लक्ष सहासष्ट हजार सहाशे सदुसष्ट फक्त) इतका निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. उपरोक्तनुसार वितरित अनुसूचित जमाती प्रवर्गाचा निधी पुढील लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ करिताच्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्र. टी-५<br>२४०१ पीक संवर्धन<br>७९६ - जनजाती क्षेत्र उपाययोजना<br>०१ जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (३२) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(६०% केंद्र हिस्सा) (कार्यक्रम)<br>(२४०१ A७४४), ३३-अर्थसहाय्य | मागणी क्र. टी-५<br>२४०१ पीक संवर्धन<br>७९६ - जनजाती क्षेत्र उपाययोजना<br>०१ जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (३३) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(४०% राज्य हिस्सा) (कार्यक्रम)<br>(२४०१ A७५३), ३३-अर्थसहाय्य |

०३. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. राष्ट्रीय कृषि विकास योजना (DPR Based Stream) अंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणी यंत्रणांकडून प्राप्त निधी मागणी, प्रकल्पाची तातडी, अंतिम टप्प्यावरील प्रकल्प व निधी लवकरात लवकर खर्च होणे इ. बाबी विचारात घेऊन प्रकल्पांचा प्राधान्यक्रम आयुक्त (कृषि) यांच्या स्तरावर निश्चित करण्यात यावा. त्यानुसार या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना (DPR Based Stream) अंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गाकरिता वितरीत करण्यात येत असलेल्या निधीचे प्रकल्पनिहाय वितरण आयुक्त (कृषि) यांच्या मान्यतेने करण्यात यावे.

०५. उपरोक्त मंजूर निधीचे तात्काळ उपयोजन होण्याच्या दृष्टीनेच कोषागरातून आहरण करावे आणि सर्व विभागांनी त्यांना प्राप्त होणाऱ्या निधीचा तात्काळ विनियोग करावा, अंमलबजावणी यंत्रणांनी निधी उपयोजनाविना बँक खात्यामध्ये जमा करुन ठेवू नये.

०६. सर्व अंमलबजावणी यंत्रणांनी/विभागांनी त्यांना सन २००७-०८ ते सन २०२३-२४ या कालावधीत वितरीत केलेल्या निधीचे सनदी लेखापालांकडून लेखापरिक्षण झाल्याचे प्रमाणित करावे.

०७. या शासन निर्णयान्वये केवळ सर्वसाधारण प्रवर्गाकरिता निधी वितरीत करण्यात आला असून सर्व विभागांनी / अंमलबजावणी यंत्रणांनी त्यांना मंजूर केलेल्या प्रकल्पांतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठी आवश्यक असलेल्या निधीकरिता उपरोक्त रकमेचा विनियोग करावा.

०८. वैयक्तिक लाभाच्या प्रकल्पांतर्गत सर्व विभागांनी / अंमलबजावणी यंत्रणांनी लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर थेट लाभ हस्तांतरणाद्वारे (DBT) अनुदान वितरीत करावे.

०९. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाचे संदर्भाधीन शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. ०१ एप्रिल, २०२४ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२८१८५५०७८३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by AMBADAS SAHEBRAO CHANDANSHIVE
Date: 2025.03.28 18:56:09 +05'30'

**(अं.सा. चंदनशिवे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम)), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन, राज्य उत्पादन शुल्क), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा. विरोधी पक्षनेता विधानसभा/ विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
८) सर्व मा. संसद सदस्य/महाराष्ट्र विधानसभा सदस्य /महाराष्ट्र विधानपरिषद सदस्य
९) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
१०) अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) अपर मुख्य सचिव (पशुसंवर्धन) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ, एपीजे हाऊस, मुंबई.
१७) राज्य सूचना अधिकारी, राज्य सूचना विज्ञान केंद्र, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१८) संचालक, माहिती तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
१९) साखर आयुक्त, साखर संकुल, पुणे.
२०) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२१) सर्व उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२३) निवडनस्ती (१४-अे कार्यासन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.